

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

मुख्य इमारत, पहिला मजला, मादाम काम मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh२-rfd@mah.gov.in

क्रमांक: गौखनी-४८/१२२०/प्र.क्र.३२८/ख-२ दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२५

विषय : गौण खनिज-वर्धा
सन २०१८-१९ या वर्षाकरिता मौजे इस्माईलपूर, ता. आष्टी या वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळू साठ्याची रक्कम परत करण्याबाबत.
**मे. बालाजी सर्व्हीसिंग सेंटर तर्फे प्रो.प्रा. सचिन रमेश गुप्ता**

**संदर्भ**:- शासनाचे सम क्रमांक दि.२९.०४.२०२१ व ०३.०२.२०२३ चे ज्ञापन

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, वर्धा यांना कळविण्यात येते की, पत्र क्र.अ.का./गौख/कावि-११८७/१९, दिनांक ०९.१२.२०१९ रोजीच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधीन शासन ज्ञापनान्वये लिलावधारक मे.बालाजी सर्व्हीसींग सेंटर तर्फे प्रो.प्रा. सचिन रमेश गुप्ता यांना मौजे इस्माईलपूर, ता. आष्टी जि.वर्धा या वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या परिमाणाच्या अनुषंगाने रू. ०३,२१,१८० (रू. तीन लाख एकवीस हजार एकशे ऐंशी फक्त) एवढी प्रमाणशीर रक्कम अदा करण्यात आली आहे.

०२. शासनाचे संदर्भाधीन शासन ज्ञापनाविरुध्द लिलावधारक यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.२७२१/२०२१ द्वारे आव्हानित केले असता, मा. न्यायालयाने सदर ज्ञापन रद्द करून लिलावधारक यांना सुनावणीची संधी देवून निर्णय घेण्याचे आदेश दिले. मा. न्यायालयाच्या आदेशाच्या अनुषंगाने मा.मंत्री (महसूल) यांनी सुनावणी अंति दिनांक १०.०१.२०२३ रोजी मौजे ईस्माईलपूर ता.आष्टी, जि.वर्धा या वाळुगटातील लिलावधारक यांना देय होत असलेल्या परताव्याची रक्कम नव्याने परिगणीत करून प्रशासकीय प्रस्ताव सादर करण्याचे आदेश दिले.

०३. मा.मंत्री (महसूल) यांच्या दिनांक १०.०१.२०२३ रोजीच्या आदेशानुसार प्रस्तुत प्रकरणी तपासणी केली असता लिलावधारक यांनी दिनांक १२.०३.२०१९ रोजी झालेल्या लिलावात सदर वाळूघाट घेतला व त्यानुषंगाने ¾ रक्कम दिनांक १५.०४.२०१९ रोजी भरणा केला आहे. दिनांक ०३.०१.२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ९ अ) (१२) मधील तरतूदीनुसार सर्वोच्च बोलीची ¾ रक्कम लिलावाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत भरणे आवश्यक असताना, ¾ रक्कमेचा भरणा दिनांक १५.०४.२०१९ रोजी केला आहे. त्यामुळे दिनांक ०३.०१.२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १० अ) (१) मधील तरतूदीनुसार लिलावधारक यांनी वाळूघाटाच्या अनुषंगाने ¾ रक्कम विहित वेळेत भरणा न केल्यामुळे लिलावधारक यांनी वाळूगटाच्या अनुषंगाने शासनास भरणा केलेल्या सर्वोच्च रकमेपैकी ¼ रक्कम म्हणजेच रू. ०५,६२,४६३/- जप्त करून व संदर्भाधीन शासन ज्ञापनान्वये लिलावधारकास प्रदान करण्यात आलेली रू. ०३,२१,१८०/- रक्कम विचारात घेवून लिलावधारकास प्रमाणशीर रक्कम रू.१०,००,५०७/- (रू.दहा लाख पाचेश सात फक्त) दिनांक ०३.०२.२०२३ च्या शासन ज्ञापनान्वये परत करण्यात आलेली आहे.

४.    विभागाचे दिनांक ०३.०२.२०२३ रोजी शासन ज्ञापन लिलावधारक यांनी मा. न्यायालयात आवहानित करण्यात आले असता, मा. न्यायालयाने दिनांक ०३.१२.२०२४ च्या आदेशान्वये लिलावधारक यांची जप्त करण्यात आलेली ¼ रक्कम परत करण्याबाबत आदेश दिले आहेत. मा. न्यायालयाने दिनांक ०३.१२.२०२४ रोजी दिलेले आदेश विचारात घेता, वाळूघाटाच्या अनुषंगाने लिलावधारक यांनी भरणा केलेल्या रकमेतून लिलावधारक यांची जप्त केलेली ¼ रक्कम रू.०५,६२,४६३/- (रू. पाच लाख बासष्ठ हजार चारशे त्रेसष्ठ फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५.    या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

६.    सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.    सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०२१११११३००९१२१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2025.02.11 11:31:36 +05'30'

**( सदानंद गो.मोहिते )**

**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, वर्धा.**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, नागपूर
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी वर्धा, वर्धा.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.